केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रम अंतर्गत आरोग्य उपकेंद्राचे बांधकाम करण्यासाठी प्रत्यार्पित करण्यात आलेला केंद्र हिश्श्यातील निधी पुनश्च वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अ.वि.वि-२०२१ प्र.क्र.०६/का-७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
तारीख: २९ /०३/२०२३

संदर्भ :-

१. संचालक आरोग्य सेवा संचालनालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र जा.क्र.संआसे/कक्ष-७अ/टे-८/अल्पसंख्याक विभाग/निधी/७९१/२०२०, दिं.१७/०२/२०२०.
२. सह सचिव,सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.३७/आ-३, दिं.२४/०२/२०२०.
३. अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांच्या २८ व्या Empowered Committee च्या बैठकीचे इतिवृत्त.
४. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. १३/५६/२०२०-MsDP-MOMA, दि ३१/०८/२०२०.
५. शासन ज्ञापन, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.अ.वि.वि.-२०२०/प्र.क्र.१९/का.७.
६. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र.अविवि-२०२१/प्र.क्र.०६/का-७, दि.१७/०२/२०२१.
७. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र.अविवि-२०२२/प्र.क्र.४६/का-७, दि.१९/०७/२०२२.
८. जिल्हाधिकारी, अकोला यांचे पत्र क्र.कक्ष /म.स./ अल्पसंख्याक / कावि-३७६ /२०२३ दि.२२/०२/२०२३.

प्रस्तावना :-

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत PMJVK गठित शक्तिप्रदान समितीने दि.२४/०८/२०२० रोजी झालेल्या २८ व्या बैठकीत मौजे वाघजाळी ता.बार्शिटाकळी जिल्हा अकोला येथे आरोग्य उपकेंद्र बांधकामाच्या रु.६६.५२/- लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली असल्याचे संदर्भ क्र. (४) अन्वये कळविण्यात आले आहे. संदर्भ क्र.६ अन्वये केंद्र शासनाकडून वितरित करण्यात आलेला केंद्र हिश्श्यातील रु.१९.९५६/- लाख तसेच राज्य हिश्यातील रु.१३.३०४/- लाख असा एकूण रु.३३.२६/- लाख इतका निधी पहिल्या टप्प्यात जिल्हाधिकारी, अकोला यांना विहित अटींच्या अधिन राहून वितरीत करण्यात आला होता. परंतु केंद्र हिस्सा निधी रू.१९.९५६/- लाख इतक्या निधीचे देयके दि.३१/०३/२०२१ रोजी पर्यंत तांत्रिक अडचणीमुळे कोषागार कार्यालयात

सादर करता आले नसल्यामुळे सदरचा निधी शासनास परत (Surrender) झालेला आहे. सदर प्रस्तावास केंद्र : राज्य हिस्सा हा ६०:४० असा आहे.

२. मौजे वाघजाळी ता.बार्शिटाकळी जिल्हा अकोला येथे आरोग्य उपकेंद्र बांधकामाकरीता वितरीत करण्यात आलेला केंद्र हिश्श्यातील रू.१९.९५६/- लाख इतका निधी शासनास Surrender केला होता. सदर रू.१९.९५६/- लाख इतका निधी दि.१९/०७/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये योजनेच्या SNA खात्यामध्ये जमा करण्यात आला आहे. योजनेच्या Single Nodal Account मध्ये जमा करण्यात आलेला रू.१९.९५६/- लाख इतका निधी PFMS प्रणालीव्दारे जिल्हाधिकारी, अकोला यांना मंजूर करून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत मौजे वाघजाळी ता.बार्शिटाकळी जिल्हा अकोला येथे आरोग्य उपकेंद्र बांधकामाकरीता वितरीत करण्यात आलेला केंद्र हिश्श्यातील रू.१९.९५६/- लाख इतका निधी शासनास Surrender केला होता. सदर रू.१९.९५६/- लाख इतका निधी दि.१९/०७/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये योजनेच्या SNA खात्यामध्ये जमा करण्यात आला आहे. योजनेच्या Single Nodal Account मध्ये जमा करण्यात आलेला रू.१९.९५६/- लाख इतका निधी PFMS प्रणालीव्दारे जिल्हाधिकारी, अकोला यांना यांना खालील तक्त्यातील स्तभं क्र (०९) प्रमाणे मंजूर करून वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**२. प्रकल्पाचे नाव - आरोग्य उपकेंद्र बांधकाम जिल्हा - अकोला (रु. लाखात)**

| उपकेंद्र /गाव | युनिट संख्या | युनिट खर्च | हिस्सा | | वितरीत पहिला हप्ता | | प्रत्यापींत (Surrender) करण्यात आलेला निधी | पुनश्च वितरीत करावयाचा प्रत्यार्पीत निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | केंद्र | राज्य | केंद्र | राज्य | केंद्र | केंद्र |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| वाघजाळी | ०१ | ६६.५२ | ३९.९१२ | २६.६०८ | १९.९५६ | १३.३०४ | १९.९५६ | १९.९५६ |
| **एकूण** | **०१** | **६६.५२** | **३९.९१२** | **२६.६०८** | **१९.९५६** | **१३.३०४** | **१९.९५६** | **१९.९५६** |

३. केंद्र शासनाकडून केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोगामध्ये अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाच्या सार्वजनिक वित्तीय प्रणाली (PFMS) व्दारे निधी वितरीत करण्यास सुरूवात करण्यात आली आहे. त्यानुषंगाने

- प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम ही केंद्र पुरस्कृत योजना असून PFMS प्रणालीच्या सुधारीत कार्यपध्दतीनुसार प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम या योजनकरीता Single

Nodal Agency म्हणून अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय यांची नियुक्ती करण्यात आली आहे.

- तसेच सदर योजनेचे **SNA** खाते स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आले आहे. सदर योजना **PFMS** प्रणालीवर **Map** करण्यात आली आहे.

४. सन २०२०-२१ या वर्षात प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून आरोग्य उपकेंद्र बांधकामास वितरीत केलेला केंद्र हिश्श्यातील निधी योजनेच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आलेल्या SNA खाते क्र.**40533345678** व **IFSC CODE - SBIN0061524** खात्यावर जमा करण्यात आला आहे.

जमा करण्यात आलेल्या योजनेच्या **SNA** खात्यामधून उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र. (९) प्रमाणे मंजूर करण्यात आलेला केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील प्रत्यार्पित करण्यात आलेला रू.**१९.९५६/-** लाख इतका निधी **PFMS** प्रणालीव्दारे पुनश्च जिल्हाधिकारी, अकोला यांना प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत आरोग्य उपकेंद्र बांधकामाकरीता वितरीत करण्यात यावा.

५. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधितांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित अंमलबजावणी अधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा.

६. जिल्हाधिकारी, अकोला यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत अंमलबजावणी यंत्रणेकडून प्राप्त विहित नमुन्यातील निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR), (अद्ययावत छायाचित्रासह) शासनास सादर करावीत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०३२९१०४६१६८७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARANGKUMAR VASANTRAO PATIL

Digitally signed by SARANGKUMAR VASANTRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=ff4eb5e12b895076f38d0375877408323ed82b780f45ba77108c21a289d50d4b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47644BA707F1CC419E5362269A74B7B1EC6AB4F745648DEF2597546D88711BB4, cn=SARANGKUMAR VASANTRAO PATIL
Date: 2023.03.29 10:50:39 +05'30'

**(सारंगकुमार पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

२. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकामे), मंत्रालय, मुंबई.

३. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. विभागीय आयुक्त, अमरावती.

५. जिल्हाधिकारी, अकोला.

६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला.

७. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

८. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.

९. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.

१०. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,अमरावती.

११. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.

१२. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अकोला.

१३. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला.

१४. वित्त विभाग ( अर्थसंकल्प -१४/ व्यय -४ ), मंत्रालय, मुंबई.

१५. नियोजन विभाग (कार्या.१४७५).

१६. निवड नस्ती ( का.७).